मासेमारी नौकांचे यांत्रिकीकरण या योजनेंतर्गत मंजूर प्रस्तावांना सन २०१४-१५ या वर्षात ५५ % निधी वितरीत करणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि-१११४/प्र.क्र.१५०/पदुम-१४**

मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२

तारीख: ३१ मार्च, २०१५

वाचा -

१. शासन निर्णय क्रमांकः रासनि-१२९३/(१५९)/पदुम-१४, दि. ८ जानेवारी, १९९६
२. शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि-२०१२/प्र.क्र.३३२/पदुम-१४, दि. ४ मार्च, २०१३
३. राष्ट्रीय सहकार विकास निगम यांचे पत्र क्र. एनसीडीसी/आरडी(डब्ल्यू)/२६-७३/८९, दिनांक १८ सप्टेंबर,२००८
४. राष्ट्रीय सहकार विकास निगम यांचे पत्र क्र. एनसीडीसी/१-१/२००१-फिश, दिनांक ३१ जानेवारी,२०१२
५. शासन निर्णय क्रमांक मत्स्यवि-१११४/ प्र.क्र.१५०/पदुम-१४, दि. ८.८.२०१४
६. आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे पत्र क्र.मत्स्य/सां/०६११०१/२९/२०१४-१५, दिनांक १३.३.२०१५

प्रस्तावना -

मासेमारी नौकांचे यांत्रिकीकरण योजनेअंतर्गत मच्छिमारांना यांत्रिकी नौका बांधणीकरीता राष्ट्रीय सहकार विकास निगम पुरस्कृत योजनेखाली अर्थसहाय्य देण्याची योजना शासनामार्फत राबविण्यात येते. यासाठी राष्ट्रीय सहकार विकास निगमकडून मंजूरी दिलेल्या प्रस्तावांकरिता राज्य शासनास ८० % कर्ज मंजूर करण्यात येते. त्यापैकी राज्य शासनाकडून मच्छिमार संस्थेच्या गटास प्रथम १०% खास विमोचक भागभांडवल (राज्य),२०% खास विमोचक भागभांडवल(रा.स.वि.नि.) व ५% भागभांडवल (रा.स.वि.नि.) असा एकूण २५% निधी राज्य शासनाकडून दिला जातो. त्यानंतर नौकेच्या कामाची प्रगती पाहून उर्वरित ५५% कर्ज उपलब्ध करुन देण्यात येते. सदर योजनेअंतर्गत राष्ट्रीय सहकार विकास निगमकडून मंजूरी प्राप्त असलेल्या एकूण ११ गटांना ५५% कर्जाची रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

मासेमारी नौकांचे यांत्रिकीकरण या योजनेअंतर्गत मच्छिमारांना यांत्रिक नौका बांधणीकरीता राष्ट्रीय सहकार विकास निगम पुरस्कृत योजनेखाली अर्थसहाय्य या योजनेअंतर्गत ५५% रकमेच्या हिश्यापोटी सोबत जोडलेल्या परिशिष्ट -अ मधील एकूण ११ मच्छिमार सहकारी संस्थांच्या ११ गटांना रु.२,४६,९६,२५५/- ( रुपये दोन कोटी शेहचाळीस लाख शहयाण्णव हजार दोनशे पंचावन्न फक्त ) इतका निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भाधिन शासन निर्णय दिनांक ४.३.२००१३ मध्ये नमूद केल्यानुसार राष्ट्रीय सहकार विकास निगमकडून मंजूरी प्राप्त गटांपैकी ज्या गटांनी दिनांक ४.३.२०१३ पूर्वी लाकडी नौकऐवजी फायबर नौका बांधल्या आहेत, अशा गटांना रा.स.वि.नि. च्या दिनांक १८.९.२००८ च्या पत्रान्वये निश्चित केलेली फायबर बोटीची किंमत अथवा फायबर बोट बांधण्यासाठी आलेला प्रत्यक्ष खर्च यापैकी जी कमी असेल, ती रक्कम अनुज्ञेय राहील. अधिकची रक्कम कोषागारात जमा करण्यात यावी. तसेच ज्या गटांनी दिनांक ४.३.२०१३ नंतर लाकडी नौकऐवजी फायबर नौका बांधल्या आहेत, अशा गटांना रा.स.वि.नि. च्या दिनांक ३१.१.२०१२ च्या पत्रान्वये निश्चित केलेली फायबर बोटीची किंमत अथवा फायबर बोट बांधण्यासाठी आलेला प्रत्यक्ष खर्च यापैकी जी कमी असेल, ती रक्कम अनुज्ञेय राहील. अधिकची रक्कम कोषागारात जमा करण्यात यावी. संबंधित गटांना अनुज्ञेय असलेल्या रकमेपेक्षा जास्त रक्कम वितरीत होणार नाही, हे पाहण्याची जबाबदारी सर्व संबंधित आंहरण व संवितरण अधिकाऱ्याची राहील.

३. याकरिता येणारा खर्च “ मागणी क्रमांक-डी-९, ६४०५-मत्स्यव्यवसायासाठी कर्जे, (००) (१९५) मच्छिमार सहकारी संस्थांना कर्जे, पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना, (००) (०१) यांत्रिक नौका /खोल सागरातील मासेमारी नौकांसाठी कर्ज-रा.स.वि.नि. हिस्सा (भारीत) (६४०५ ००८१), ५५ कर्जे व आगाऊ रक्कमा या लेखाशिर्षातंर्गत सन २०१४-१५ साठीच्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. याबाबत संबंधित जिल्हयांचे सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय (तांत्रिक) हे आहरण व संवितरण अधिकारी राहतील. तसेच आयुक्त, मत्स्यव्यवसाय हे नियंत्रक अधिकारी राहतील.

५. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २०२/१५/व्यय-२, दिनांक ३१.३.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३१२०५४५४३६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Parvez Ahmad Shahabuddin

Digitally signed by Parvez Ahmad Shahabuddin
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Parvez Ahmad Shahabuddin
Date: 2015.04.01 17:01:46 +05'30'

**( प.श. अहमद )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, मुंबई शहर/मुंबई उपनगर/ठाणे/ रायगड/ रत्नागिरी/
३. सह आयुक्त (सागरी), आयुक्त, मत्स्यव्यवसाय याचे कार्यालय, मुंबई
४. प्रादेशिक उपआयुक्त, मुंबई विभाग, मुंबई
५. सहायक आयुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई शहर/मुंबई उपनगर/ठाणे/ रायगड/ रत्नागिरी
६. महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता ) मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. निवासी लेखाधिकारी, मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई शहर/मुंबई उपनगर/ठाणे/ रायगड/ रत्नागिरी/
१०.उप जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई शहर/मुंबई उपनगर/ठाणे/ रायगड/ रत्नागिरी
११.सर्व संबंधित संस्था
१२.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.वित्त विभाग (व्यय-२/अर्थसंकल्प/अर्थबळ), मंत्रालय, मुंबई
१४.कार्यासन पदुम-१६, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.निवड नस्ती, पदुम-१४

**प्रत माहितीकरिता,**

सचिव (पदुम) यांचे स्वीय सहाय्यक

शासन निर्णय क्रमांक: मत्स्यवि-१११४/ प्र.क्र.१५०/पदुम-१४, दिनांक ३१ मार्च, २०१५ सोबतचे परिशिष्ट- अ

| अ.क्र | जिल्हा | संस्था | गट | प्रकल्प किंमत | प्रकल्प किंमतीच्या ५५% अनुज्ञेय रक्कम | यापूर्वी वितरीत केलेली रक्कम | आता वितरीत करावयाची रक्कम रक्कम | नौका प्रकार |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | | ३ | ४ | ६ | | | | |
| १ | मुंबई-शहर | अखिल भारत मच्छिमार सहकारी सोसायटी | श्री. बाळासाहेब दत्तोबा शिंदे | ५५२७२०० | ३०४०००० | ० | ३०४०००० | फायबर नौका |
| २ | | ओम शिवालिक म.स.सो. | श्री.जितेंद्र सुरेश नाखवा | ५८१७४०० | ३१९९६०० | ० | ३१९९६०० | लाकडी नौका |
| ३ | मुंबई उपागर | माहूल मत्स्यव्यवसाय सह. सेवा संस्था मर्या. माहूल | श्री. प्रविण मन्नु सोलंकी | ५५३३४०० | २९३८८५९ | २४३८८५९ | ५००००० | फायबर नौका |
| ४ | ठाणे | निर्मलसागर ॲक्वा म.स.सं. | श्री.दशरथ शांताराम बारी | १८२४९०० | १००३७०० | ० | १००३७०० | लाकडी नौका |
| ५ | | झाई मच्छीमार विविध कार्य. स. सं. | श्री. शेखर गजानन मस्करीया | ५५३४२०० | २९३९३१० | ० | २९३९३१० | लाकडी नौका |
| ६ | रायगड | बोर्लीमांडला मच्छी. सह. उत्पा. मं. | श्री. जीवन तुकाराम परदेशी | ५८९५००० | ३२४२२५० | ० | २७४७११५ | फायबर नौका |
| ७ | | द्रोणागिरी माऊली मच्छीमार विविध कार्य. सह सो.लि. रायगड | श्री. प्रविण महादेव नाखवा | ४७८०१०० | २६२९०५५ | ० | २६२९०५५ | फायबर नौका |
| ८ | | दर्यावर्दी मच्छि.वि.का.सहसो.लि. | श्री. सूरजा मुद्दीप्पा नुरबस | ४८१४३०० | २६४७८६५ | ० | २६४७८६५ | फायबर नौका |
| ९ | रत्नागिरी | राजीवडा महिला मच्छी. सह सं. | श्री.समीर लतीफ कसू | ६९१२००० | ३८०१६०० | २८८८१२५ | ९१३४७५ | फायबर नौका |
| १० | | हरेश्वर स.म.स.सो | मच्छिंद्र पांडुरंग काळपाटील | ३८११७०० | २०९६४०० | ० | २०९६४०० | लाकडी नौका |
| ११ | | रत्नदूर्ग म.स.सं. | श्री.संतोष सुभाष सुर्वे | ५४१७७०० | २९७९७३५ | ० | २९७९७३५ | फायबर नौका |
| | | **एकूण प्रलंबित** | | **५५८६७९००** | **३०५१८३७४** | **५३२६९८४** | **२४६९६२५५** | |